राज्य शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी
अग्रिम म्हणून द्यावयाच्या रकमेची मर्यादा
शिथिल करणे -

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक: एचबीए-१०८४/सीआर-३४९/जीईएन-५,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक १ ऑगस्ट, १९८४

## शासन निर्णय

बांधकामाच्या आणि इतर अनुषंगिक घटकांच्या किमती वाढल्या असल्याकारणाने विविध घरबांधणी प्रयोजनांसाठी राज्य शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या रकमेची मर्यादा शिथिल करण्याचा प्रश्न काही काळापासून शासनाच्या विचाराधीत होता.

२. शासनाने या बाबीवर विचार केल्यानंतर शासन आता असा निदेश देत आहे की, विविध घरबांधणी प्रयोजनांसाठी राज्य शासकीय कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या रकमेची मर्यादा खालीलप्रमाणे वाढविण्यांत यावी:-
:-

[१] जमीन खरेदी आणि घरबांधणीकरिता किंवा घरबांधण्याकरिता किंवा खरेदी करण्याकरिता रु. ९०,०००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने ६० महिन्याचे वेतन ही विद्यमान मर्यादा रु. १,२५,०००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने १०० महिन्याचे वेतन अशी वाढविण्यांत येईल.

[२] रहाण्याकरिता घरबांधण्याच्या हेतूने जमीन खरेदीसाठी रु. १२,५००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने २४ महिन्याचे वेतन ही विद्यमान मर्यादा रु. ४०,०००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने १०० महिन्याचे वेतन अशी वाढविण्यांत येईल.

[३] रहात्या घराच्या जागेत वाढ करण्याच्या उद्देशाने रु. १२,५००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने २४ महिन्याचे वेतन ही विद्यमान मर्यादा रु. ४०,०००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने १०० महिन्यांचे वेतन अशी वाढविण्यांत येईल.

[४] एखादे घर निवासयोग्य करण्यासाठी आवश्यक असलेल्या खास दुरूस्त्यांच्या प्रयोजनांसाठी रु. ५,०००/- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने १२ महिन्याचे वेतन ही विद्यमान मर्यादा रु. २०,००० /- या कमाल मर्यादेच्या अधिनतेने ५० महिन्यांचे वेतन अशी वाढविण्यांत येईल.

३. हे आदेश दिनांक १ एप्रिल १९८४ पासून अंमलात येतील. तथापि पूर्वीच्या ज्या प्रकरणी घरबांधणी अग्रिम याआधीच मंजूर केले आहे परंतु, संबंधित कर्मचा-यांनी ते घेतलेले नाही अशा प्रकरणांनाजन सुध्दा नव्या अर्ज करण्यांत आल्यास पुन्हा

......२.

पुन्हा विचार करण्यास हरकत नाही, आणि ज्या प्रकरणांत घरबांधणी अग्रिम मंजूर करण्यांत आले असून संबंधित कर्मचा-यांनी ते घेतलेसुध्दा, त्या प्रकरणांत खालील अटींच्या पूर्ततेच्या अधिनतेने अग्रिमाची रक्कम वाढविण्यांत येईल :-

[१] पूर्वीच्या आदेशानुसार मंजूर केलेली घरबांधणी अग्रिमाची संपूर्ण रक्कम शासकीय कर्मचा-यांने घेतलेली नसावी.

[२] शिथिल केलेल्या योजनेप्रमाणे घरबांधणी अग्रिमातील वाढीची रक्कमही पूर्वी मंजूर केलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या ५० टक्क्यापेक्षा अधिक नसावी.

४. घरबांधणी अग्रिम नियम १९६२ मध्ये आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यांत येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मो. तु. गांगुर्डे,
शासनाचे उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [ लेखा आणि अनुज्ञेयता], मुंबई [ ८० प्रती]
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [ लेखा परीक्षण ], मुंबई ][ ८० प्रती]
महालेखापाल, महाराष्ट्र-२ [ लेखा आणि अनुज्ञेयता ], नागपूर, [४० प्रती]
महालेखापाल, महाराष्ट्र-२ [ लेखा परीक्षण], नागपूर [ ४० प्रती]
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई [ ८० प्रती]
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
वरिष्ठ उप संचालक, वाणिज्य लेखा परीक्षा, राज्य परिवहन मंडळ, वाहतूक भवन, मुंबई -४०० ००८.
मुख्य मंत्र्याचे सचिव,
x प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
x प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
x प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सर्व मंत्र्यांचे, राज्य मंत्र्याचे व उप मंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधील असलेल्या सर्व विभागाचे व कार्यालयाचे प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
संपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभागातील सर्व कार्यासने [ ५ प्रती ग्रंथपालाकरिता ],
निवड नस्ती, कार्यासन जीईएन-५, वित्त विभाग

---

x पत्राव्दारे

क्रमांक दिनांक